शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार सन २०२३-२४
साठी निवड समितीची स्थापना करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक: राक्रीपु-३१२५/प्र.क्र.०२/क्रीयुसे -२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ११ फेब्रुवारी, २०२५

वाचा-

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.शिछपु-२०२३/प्र.क्र.१८८/क्रीयुसे-२, दि.२९ डिसेंबर, २०२३
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.शिछपु-२०२३/प्र.क्र.१८८/क्रीयुसे-२, दि.२५ जानेवारी, २०२४
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचा प्रस्ताव क्र.शिवछ/रापुनिसग२३-२४/सन २०२४-२५/का-१४/४०९०, दि.२४.०१.२०२५

**प्रस्तावना -:**

महाराष्ट्र राज्यातील सर्वोत्कृष्ट क्रीडापटू, क्रीडा कार्यकर्ते तसेच महाराष्ट्रातील क्रीडा क्षेत्राच्या प्रगतीसाठी अहर्निश व सेवाभावी वृत्तीने कार्य करणा-या खेळाडू/व्यक्तींना शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कार, उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक मार्गदर्शक पुरस्कार, शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (खेळाडू), शिवछत्रपती राज्य क्रीडा साहसी पुरस्कार, शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (दिव्यांग खेळाडू), व जिजामाता पुरस्कार देऊन गौरविण्यात येते. या पुरस्काराच्या सुधारीत नियमावलीस दिनांक २९.१२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयामध्ये शिवछत्रपती पुरस्कारार्थीना निवडीसाठी राज्यस्तरीय पुरस्कार निवड समिती गठीत करण्याची तरतूद आहे. यास्तव सन २०२३-२४ या वर्षाची पुरस्कार निवड समिती गठीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कार, उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक पुरस्कार, शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (खेळाडू), शिवछत्रपती राज्य क्रीडा साहसी पुरस्कार, शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार (दिव्यांग खेळाडू), व जिजामाता पुरस्कार देण्याकरीता संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयातील नियम क्र. १.२७ मधील तरतूदीनुसार खालील प्रमाणे निवड समिती गठीत करण्यात येत असून खालील नमूद अशासकीय (तज्ज्ञ) सदस्यांची नियुक्ती करण्यास शासन मान्यता देत आहे.

## राज्यस्तरीय पुरस्कार निवड समिती

| अ.क्र. | सदस्यांचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १. | मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण | अध्यक्ष |
| २. | अ.मु.स./प्र. स./सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | सदस्य |
| ३. | १. श्रीम. शकुंतला खटावकर (अर्जुन पुरस्कार्थी)<br>२. श्रीम. सुमा शिरुर (अर्जुन पुरस्कार्थी)<br>३. श्री.काका पवार (अर्जुन पुरस्कार्थी)<br>४. श्री. कमलेश मेहता (अर्जुन पुरस्कार्थी)<br>५. श्री.मनोज पिंगळे (अर्जुन पुरस्कार्थी) | अशासकीय सदस्य (तज्ञ) |
| ४. | महाराष्ट्र ऑलिंपिक व पॅरा ऑलिंपिक असोसिएशन यांचा प्रत्येकी एक प्रतिनिधी | अशासकीय सदस्य |
| ५. | आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य सचिव |

२. उपरोक्त सदस्यांना शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २४.०२.२०१२ नुसार बैठक भत्ता तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ०३.०३.२०१० च्या परिच्छेद १२ मधील तरतुदीनुसार प्रवासभत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. सदर खर्च हा शिवछत्रपती क्रीडापीठ, बालेवाडी, पुणे येथील जमा निधीतून भागविण्यात यावा.

३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे तथा सदस्य सचिव, पुरस्कार निवड समिती यांनी समितीची बैठक आयोजित करण्याबाबत आवश्यक ती पुढील कार्यवाही तात्काळ करावी.

.३ सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१११६२२२१२३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ASHOK HANMANLU DAMAYYAWAR
Date: 2025.02.11 16:29:29 +05'30'

**(अशोक ह. दमय्यावार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास, गृहनिर्माण, सार्वजनिक उपक्रम) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

४) मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

६) अपर मुख्य सचिव, क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

७) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,

८) सर्व विभागीय उपसंचालक,

९) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी,

१०) समितीतील इतर सदस्य (आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांचेमार्फत)

११) निवडनस्ती (क्रीयुसे-२).